शालेय प्रकाशन : १

# नवे किरण

(कणेकरांचे निवडक लघुनिबंध)

संपादक
वि. स. खांडेकर

किंमत दीड रुपया

## दिग्दर्शन

सात आठ वर्षांपूर्वी मुंबईच्या रेडियोवर मला एक भाषण करायचें होतें. माझा विषय होता 'काणेकरांची उत्कृष्ट कृति.' काणेकर तेव्हांहि माझे एक आवडते लेखक होते. पण या कारणामुळेंच त्यांची सर्वांत सरस अशी कला-कृति कोणती हें निश्चित करतांना माझ्या मनाचा मोठा गोंधळ उडाला. एखाद्यानें उन्हाळ्यांत फळें घेण्याकरितां म्हणून मंडईंत जावें आणि इकडे द्राक्षांचे घोंस लटकत असावेत, तिकडे उघड्या करंड्यांतून हापूसपायरीचे विविध आकर्षक रंग दिसावेत, तिसरीकडून पिकलेल्या अननसांचा मस्त सुवास वाऱ्यावरून दरवळत यावा—कांहींशी तशीच स्थिति झाली माझी.

क्रिकेटच्या क्रीडांगणावर कांहीं कांहीं खेळाडू फार वेळ टिकत नाहींत. पण मिळेल तेवढ्या थोड्या वेळांत सुद्धां ते मोठा चमकदार खेळ खेळून जातात. काव्यक्षेत्रांत काणेकर असेच चमकले होते. तिथले ते मुश्ताकअल्लीच होते म्हणाना. त्यांच्या कवितांची संख्या डोळ्यांत भरण्याजोगी नसली, तरी त्यांच्या कांहीं कांहीं कल्पना दीर्घकाल माझ्या कानांत आणि मनांत घुमत राहतील, याविषयीं मला शंका नव्हती. तेव्हांचीच गोष्ट कशाला हवी? त्यांची 'चांदरात' मी वाचल्याला एक तप होऊन गेलें. पण केव्हां तरी लहर आली, म्हणजे अजूनहि त्यांच्या खालील ओळी मी मनाशीं मोठ्या आनंदानें गुणगुणतों

> 'तडफडे जिवाचें पांखरुं केविलवाणें
> होत ना सहन त्या एकलकोंडें जगणें
> जोडीस शोधितें उदात्त अपुल्यावाणी
> प्रतिशब्द जिवाचा न दिला अजुनी कोणीं'
>
> 'घाव घालितां हार हिऱ्यांचा तुम्हांलाच अर्पिन
> असली माझी ही ऐरण!'
>
> 'अज्ञाताच्या काळोख्या त्या दरींत कोठेंतरी
> कसले दिवे लाल केशरी?

'जलवलयांचें तरल रुपेरी नुपूर पदिं बांधुनी
खळखळत गुंग झरा नर्तनीं'

'असेल काळाहातीं मरणें
परी आमुच्या हातीं जगणें
कां नच मग वीरोचित जगणें
अभिमानानें हांसत मरणें?'

'माता, बंधु बहीण कोणि नव्हतें प्रेमी तया माणुस
मी केलें स्मित त्यास पाहुनि तदा तोही जरा हांसला
एकाद्या थडग्यावरी धवलशीं पुष्पें फुलावीं जशीं
तैसें हास्य मुखावरी विलसलें त्या बापड्याच्या दिसे
तो हांसे परि मद्‌हृदीं भडभडे—चित्ता जडे खिन्नता
नाचो आणिक बागडो जग, नसे माझ्या जिवा शांतता!'

काणेकरांच्या अशा अनेक हृदयंगम काव्यपंक्तींची आठवण होत असूनहि त्या वेळीं उत्कृष्ट कलाकृति म्हणून मी त्यांच्या कुठल्याहि कवितेची निवड केली नाहीं. काव्याप्रमाणें त्यांचें कथालेखनहि वैशिष्टयपूर्ण आहे. 'काल-प्रवाहाशीं झुंज' ही त्यांची गोष्ट आजच्याइतकीच तेव्हांहि मला आवडत असे. या कथेच्या चित्रणांत उत्कट सहानुभूति व कलात्मक संयम यांचा जो सुरेख संगम काणेकरांनीं साधला आहे, तो मला नेहमींच मोहक वाटत आला आहे. असें असूनहि उत्कृष्ट कलाकृति म्हणून मी त्यांच्या या लघुकथेची त्या वेळीं निवड केली नाहीं. मी रेडियोवर बोललों तो 'दोन मेणबत्त्या' या त्यांच्या एका अप्रतिम लघुनिबंधावर. काव्य व कथा या दोन्ही क्षेत्रांत काणेकरांचें स्थान मानाचें असलें तरी त्यांच्या वाङमयीन व्यक्तित्वाचे सर्व पैलू यथार्थ-तेनें जर कुठें प्रतिबिंबित झाले असतील, तर ते त्यांच्या लघुनिबंधांतच. काव्य, कथा, टीका, एकांकिका, प्रवासवर्णन इत्यादि क्षेत्रांत त्यांच्या लेखणीनें लीलेनें संचार केला आहे हें खरें; पण तिच्या सौंदर्याचा आणि सामर्थ्याचा अत्यंत वैशिष्टयपूर्ण आविष्कार लघुनिबंधांतच झाला आहे, असें मला वाटतें.

• • •

तसें पाहिलें तर मराठी लघुनिबंधाचा जन्म होऊन अजून पुरीं दोन तपें-सुद्धां झालीं नाहींत. १९२५ च्या पूर्वी लघुनिबंधाशीं थोडेंफार साम्य पावणारें लिखाण क्वचित् लिहिलें जाई, नाहीं असें नाहीं. पण त्याचा उगम कल्पनेच्या स्वच्छंद विलासांत किंवा निबंधाचा गंभीरपणा नाहींसा केल्याशिवाय त्याच्या द्वारें होणारा प्रचार बहुजनसमाजापर्यंत पोंचणार नाहीं या विचारांत होता. शिवरामपंत परांजपे आणि अच्युतराव कोल्हटकर यांच्या लिखाणांत लघु-निबंधांत सहज शोभून जातील अशीं स्थळें मधून मधून आढळतात याचें कारण हेंच आहे. 'मासिक मनोरंजनां'त १९१० ते १५ च्या दरम्यान आलेले गुरुवर्य वासुदेवराव पटवर्धनांचे 'विरोळचानें काय शिकविलें?' किंवा 'थोडे वेडे व्हा वेडे!' हे लेखहि लघुनिबंधाकडेच झुकलेले होते. जुन्या निबंधांतला प्रचार, पांडित्य आणि परंपरागत मांडणी यांपैकीं कुठलीच गोष्ट त्या लेखांत नव्हती. उलट स्वतःच्या दृष्टीनें जीवन पाहून तें कसें आहे आणि तें कसें असावें हें सांगण्याची नव्या निबंधाला शोभणारी वृत्ति या दोन्ही लेखांत मोठ्या प्रमाणांत प्रकट झाली होती. जुन्या निबंधाचें बंदिस्त आणि त्याचमुळें सांचेबंद होणारें तंत्र हे लेख लिहितांना पटवर्धनांनीं दूर झुगारून दिलें होतें यांत संशय नाहीं. 'विरोळचानें काय शिकविलें?' या लेखाचा आरंभ त्यांनीं एकाद्या गोष्टीसारखा केला होता. 'थोडे वेडे व्हा वेडे' या छोटचा निबंधांत ज्याला कशाचें तरी वेड लागतें तोच खरा शहाणा मनुष्य होय, या तत्त्वावर नवीन निवेदनपद्धति अंगीकारून त्यांनीं प्रकाश टाकला होता.

प्रो. फडक्यांनीं १९२५ सालीं 'गुजगोष्टी' लिहायला सुरुवात करून स्वैर, खेळकर व आत्मनिष्ठ निबंधाचा हा नवा प्रकार मराठींत रूढ करण्याचा पहिला पद्धतशीर प्रयत्न केला. फडके 'गुजगोष्टी' लिहायला लागले तेव्हां इंग्रजी लघुनिबंधाचा (personal Essay) आपल्या विद्यापीठांच्या अभ्यासक्रमांत नुकताच समावेश झाला होता. गार्डिनरसारखे लोकप्रिय असलेले व अभ्यासक्रमांत स्थान मिळालेले लघुनिबंधकार फडक्यांनीं त्या वेळीं वाचले असतील यांत नवल नाहीं. पण या विशिष्ट लेखनप्रकारासाठीं त्यांनीं इतरहि अनेक लघुनिबंधकार अभ्यासिले असावेत असें दिसतें. लघुनिबंधविषयक इंग्रजी

पुतकांत ज्याचा सहसा उल्लेख आढळत नाहीं, अशा रिचर्ड किंग या विचार-प्रधान पण अत्यंत आकर्षक लघुनिबंधलेखन करणाऱ्या लेखकाचा उल्लेख त्यांच्या साहित्यसेवेंतील स्मृतींत आढळतो. मात्र फडक्यांना किंगची लेखन-पद्धति आवडली असली तरी त्यांच्या 'गुजगोष्टीं'चें त्याच्या लिखाणाशीं मुळींच साम्य नाहीं, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. किंबहुना आरंभींच्या गुजगोष्टी लिहितांना विषय, मांडणी व भाषाशैली या तिन्ही दृष्टींनीं ते जुन्या व नव्या निबंधांच्या संमिश्र छायांत वावरत होते असेंच दिसून येईल. 'सुहास्य', अलंकार', 'संसार', 'एकांतवास' हे त्यांचे पहिले विषय पाहिले किंवा शाईसारख्या गुजगोष्टीचा शेवट ' किंवा असेंहि असेल कीं संसाराच्या कष्टमय मार्गावर प्रकाश पडावा म्हणून ज्ञानवंतांनीं आपल्या नरदेहाच्या वाती पेटवून जे दिवे लावले त्यांच्या काजळीपासूनच हा शाईचा द्रव तयार झाला आणि कोणी अधम मतिमंदानें त्याचा कितीहि दुरुपयोग केला तरी अखेर ज्या पुण्याईच्या आधा-रावर विश्वाचें पालनपोषण चाललें आहे, ती वाढविण्याकडेच त्याचा अधिक विनियोग होणार आहे, यांत शंका नाहीं' अशा अगडबंब वाक्यानें झालेला पाहिला,(त्याच वर्षीं रंगभूमीवर आलेलें 'मेनका' नाटक पाहून आल्यावर लगेच फडक्यांनीं हा लघुनिबंध लिहिला असावा, असा या वाक्यावरून भास होतो) म्हणजे, फडके, १९२५ सालीं लघुनिबंधाच्या क्रीडांगणावर उतरले असले तरी ते प्रथम विचकत वाचकत खेळत होते, असें वाटूं लागतें. त्यांच्या खेळाला जरा रंग चढला सहा वर्षांनीं. पहिल्या अकरा गुजगोष्टी लिहून झाल्यानंतर दोन वर्षें ते स्तब्ध राहिले. नंतर १९३१ सालीं 'पाऊस' ही सुरस गुजगोष्ट त्यांच्या लेखणींतून उतरली. इथून त्यांच्या गुजगोष्टींचें स्वरूप बदललें. त्यांच्यांत आत्मदर्शन, साधे पण नवे विषय, कल्पना व भावना यांचा स्वाभा-विक विलास, सहजसुंदर शैली इत्यादिकांचा रमणीय आविष्कार मोठ्या प्रमाणांत होऊं लागला. 'हरवली म्हणून सांपडली,' 'एक रात्र आणि एक पहांट', 'न वाचलेल्या ग्रंथांची गोडी', व 'सहल' या १९३१ ते ३३ या काल-खंडांतल्या त्यांच्या चार गुजगोष्टी वाचकांनीं पुनः पुन्हां वाचाव्यात इतक्या मधुर उतरल्या आहेत.

फडके हजारों वाचकांना आपल्या या गुजगोष्टींनीं मोहिनी घालीत असतां-नाच काणेकरांनीं १९३३ सालीं लघुनिबंधाच्या क्षेत्रांत प्रवेश केला. पण तो

कसा? आपण लघुनिबंधलेखक कसे झालों हें सांगतांना काणेकर म्हणतात, 'संजीवनीचे प्रभाकरपंत कोल्हटकर माझ्याकडून 'पिकलीं पानें' लिहून घेईपर्यंत मी कधींकाळीं लघुनिबंध लिहूं शकेन, अशी माझी कल्पनाहि नव्हती.' प्रथमदर्शनीं हें विधान मोठें चमत्कारिक वाटतें. लढाईची कांहींच कल्पना नसलेला मनुष्य सेनापति कसा होईल? असा प्रश्न क्षणभर आपल्या मनांत आल्यावांचून रहात नाहीं. पण लघुनिबंध-लेखक या नात्यानें काणेकरांना मिळालेल्या यशाचें रहस्य त्यांच्या या उद्‌गारांतच सांठविलेलें आहे. 'संजीवनी'च्या संपादकांच्या आग्रहावरून त्यांनीं लघुनिबंध लिहायला सुरुवात केली हें खरें; पण ते लिहितांना त्यांनीं आपल्या भोंवतालचे मराठी लेखक हा वाङ्मयप्रकार कसा हाताळीत आहेत हें निरखून पाहिलें नाहीं किंवा इंग्रजी लघुनिबंधकार आणि त्यांचे टीकाकार यांची खास सल्लामसलतहि घेतली नाहीं. त्यांच्या मनांत जें सळसळत होतें त्यांच्या हृदयांत जें वारंवार उचंबळून येत होतें, त्यांच्या आत्म्याला जें पुन्हा पुन्हां शल्यासारखें टोचत होतें, त्याचा या नव्या लेखनप्रकारांतून आविष्कार करायला त्यांनीं सुरुवात केली. त्यांनीं आदर्श म्हणून कुणाच्या तोंडाकडे पाहिलें नाहीं किंवा अनुकरण म्हणून कुणाच्या पावलावर पाऊल टाकून जाण्याचा प्रयत्न केला नाहीं. त्यामुळें त्यांच्या लिखाणाला ताजेपणाची विलक्षण लज्जत आली, त्यांतून लेखकाच्या वाङ्मयीन व्यक्तित्वाचा स्वच्छंद आविष्कार झाला. जे रसिक फडक्यांच्या 'गुजगोष्टी' मोठ्या गोडीनें वाचीत होते, त्यांनासुद्धां काणेकरांच्या आंबटगोड लघुनिबंधांची खुमारी कांहीं न्यारी आहे, हें आनंदानें मान्य करावें लागलें. फडक्यांची गुजगोष्ट ही शृंगारलेल्या मंदिरासारखी होती. त्या शृंगाराची नक्कल करण्याचा काणेकरांनीं प्रयत्न केला असता, तर त्यांचें कुणीच कौतुक केलें नसतें. पण त्यांनीं स्वतःच्या विचारांचा आणि भावनांचा आविष्कार अत्यंत प्रामाणिकपणानें केला. त्या आविष्काराकरितां त्यांनीं जी शैली वापरली, तीसुद्धां आपल्या विषयांना अनुरूप आणि आपल्या व्यक्तित्वाशीं सुसंगत अशी! त्यामुळें त्यांचा उत्कृष्ट लघुनिबंध वाचतांना समोर चित्र उभें राहतें तें एकाद्या उत्तुंग पर्वतशिखराचें! गगनाला स्पर्श करण्याची महत्त्वाकांक्षा हेंच त्या शिखराचें वैभव असतें. ओवडधोवड खडकांशिवाय

तिथें दुसरे गालिचे नसले, तरी राजमंदिरांत शपथेलासुद्धां न आढळणाऱ्या शुद्ध मोकळ्या हवेंत माणसाला उल्हसित करण्याची जी शक्ति असते, तिचें दर्शन काणेकरांच्या लघुनिबंधांत वाचकांना होतें.

● ● ●

लघुनिबंधकार या नात्यानें काणेकरांना मिळालेल्या लोकप्रियतेची मीमांसा मोठी मनोरंजक होऊं शकेल. कलावंताच्या प्रतिभेचें वैशिष्टय, त्याच्या व्यक्तित्वाचा विकास आणि कालाचें आवाहन (The spirit of the time) यांचा मनोहर मेळ त्यांच्या लघुनिबंधांत पडला, असें म्हणायला हरकत नाहीं. १९३० सालीं गांधीजींनीं मिठाचा कायदा मोडून एक अपूर्व उग्र चळवळ सुरू केली. महात्माजींचें व्यक्तित्व आणि गांधीवादाचें सामर्थ्य यांनीं असंख्य बुद्धिमान् तरुणांना या चळवळीकडे आकृष्ट केलें. तुरुंगाचा कांटेरी दरवाजा हें राजवाड्याचें महाद्वार समजून त्यांनीं त्यांत प्रवेश केला. पण पुढें तिथल्या शांत वाचनांत, क्षुब्ध वादविवादांत आणि एकाग्र चिंतनांत त्यांच्यापैकीं अनेकांना गांधीवादाच्या मर्यादा पूर्णपणें कळून चुकल्या. साहजिकच हे युवक समाजवादाकडे वळले. त्यांनीं विचारपूर्वक त्या तत्त्वज्ञानांतल्या सत्त्वांशाचा स्वीकार केला. तिकडे राजकारणांत जसें हें स्थित्यंतर घडून येत होतें, त्याप्रमाणें ललित वाङ्मयांतहि कांहीं नवे जुने लेखक मध्यमवर्गापुरती मर्यादित झालेली सामाजिक प्रश्नांची कोंडी फोडून नव्या पाऊलवाटेनें जाण्याचा प्रयत्न करीत होते. 'इंदु काळे व सरला भोळे' 'मुक्तात्मा', 'धांवता धोटा', 'उल्का', 'दोन ध्रुव' इत्यादि कादंबऱ्या १९३३–३४ या दोन वर्षांतच प्रसिद्ध झाल्या आहेत हें लक्षांत घेतलें म्हणजे ही नवी पाऊलवाट कोणत्या प्रकारची होती, याची सहज कल्पना येईल. केवळ ऐतिहासिक दृष्टीनें पाहिलें तर १९१७ सालीं रशियांत राज्यक्रांति होऊन समाजसत्तावादी विचारसरणीचा पुरस्कार करणारें कामकरी–शेतकऱ्यांचें सरकार तिथें प्रस्थापित झाल्यावर लौकरच त्या तत्त्वज्ञानाचें रोप आपल्या देशांत आणून लावण्याची खटपट करणारी मंडळी आपल्याकडे निघाली. मीरत कटाचा प्रख्यात खटला १९३० च्या मीठलुटीच्या मोहिमेपूर्वींच गाजला होता. मुंबईच्या मजुरांनीं कायदेभंगाच्या चळवळीपूर्वींच

मोठमोठे संप लढवायला सुरुवात केली होती. राजकारणाकडे ओढा असलेल्या शहरांतल्या तरुणांवर या नव्या तत्त्वज्ञानाचा पगडा बसत चालल्याची स्पष्ट अस्पष्ट चिन्हेंहि त्या वेळीं सर्वत्र दिसूं लागलीं होतीं. पण हें सारें जमेला धरूनहि १९३२ पूर्वी ससाजवादी विचारसरणीनें मराठी मनांत मूळ धरलें नव्हतें, असें म्हणणें फारसें चुकीचें होणार नाहीं. एक तर १९२० सालीं असहकारितेची अभूतपूर्व चळवळ सुरू करून जनमनावर अधिराज्य गाजवूं लागलेल्या गांधी-जींच्या तेजस्वी नेतृत्वाचें पहिलें तप १९३२ त पुरें झालें. दुसरी गोष्ट म्हणजे समाजसत्तावादाचा प्रथम पुरस्कार करणाऱ्या कम्युनिस्ट कार्यकर्त्यांनीं आपलें सर्व लक्ष मजूरसंघटनेंत घातल्यामुळें त्यांच्या कार्यक्षेत्राला साहजिकच मर्यादा पडल्या. मोठमोठे कारखाने किंवा गिरण्या असलेल्या शहरांतूनच त्यांच्या विचारसरणीचा थोडाबहुत प्रचार होऊं शकला. यापेक्षांहि महत्त्वाची गोष्ट अशी कीं, कुठलेंहि तत्त्वज्ञान जोंपर्यंत समाजाच्या मर्यादित भागांत आणि पुस्तकी प्रचारांत गुंतून पडलेलें असतें, तोंपर्यंत त्याचे पाझर सर्वसामान्य सामाजिक मनांत फारसे झिरपत नाहींत आणि म्हणूनच जीवनाचीं सूक्ष्म आणि विविध चित्रें रेखाटणाऱ्या ललित वाङ्मयांत त्याचें प्रतिबिंब पडलेंच तरी तें फार अंधुक व प्रसंगीं विकृत असें असतें. कोणतीहि गोष्ट सामाजिक मनांत शिरून तिथें मुरूं लागली म्हणजेच ललित वाङ्मयांत तिच्या चित्रणाला बहर येऊं लागतो. १९३२ नंतर राष्ट्रीय सभेचें अनुयायित्व मान्य करूनहि समाजवादाचा पुरस्कार करणारा पक्ष जसा राजकारणांत निर्माण झाला, त्याप्रमाणें वाङ्मयांतहि समाजवादाविषयीं सहानुभूति बाळगणारे आणि आपले सामाजिक अनुभव या नव्या तत्त्वज्ञानाच्या भाषेंत बोलून दाखविणारे लेखक हळूहळू पुढें येऊं लागले. या लेखकांची प्रेरणा केवळ पुस्तकी नव्हती, तिच्यांत अनुभूतीचा थोडाफार अंश होता. दिवसेंदिवस विक्राळ स्वरूप धारण करीत चाललेली आर्थिक विषमता, मागील पिढीनें केलेल्या सामाजिक सुधारणांच्या पुरस्कारांतून साहजिकच निर्माण होणारा सर्वांगीण समतेचा प्रश्न, कालाबरोबर दलित वर्गांत आपल्या हक्कांकविषयीं होऊं लागलेली जागृति, कायदेभंगाच्या चळवळींत दिसून आलेल्या गांधीवादाच्या मर्यादां-मुळें त्याची समाजवादाशीं होऊं लागलेली तुलना, शॉ, गॉर्की, इब्सेन, अप्टन, सिंक्लेअर इत्यादिकांच्या वाङ्मयाशीं तरुण पिढीचा होऊं लागलेला दृढ

परिचय, एक ना दोन अशीं अनेक कारणें तत्कालीन लेखकांच्या दृष्टिकोनांत घडून आलेल्या या बदलाच्या मुळाशीं दिसतील. काणेकरांचा 'चांदरात' हा काव्यसंग्रह घेतला तरी त्यांतसुद्धां हा फरक स्पष्टपणें प्रतिबिंबित झालेला आढळेल. १९२९ पूर्वीं त्यांनीं लिहिलेल्या कांहीं कवितांत उत्कट जीवननिष्ठा व्यक्त झाली असली तरी तिचें स्वरूप सामाजिक नाहीं. १९२९ नंतर हें सारें बदलून गेलें. याच वर्षीं लिहिलेल्या 'लाल बावटयाचें गाणें' या कवितेंत ते म्हणतात—

'लाखांचें मारूनि पोट,
चाटित जे बसले ओठ
त्या चोरां हतबल करुनी
सर्वस्वा त्यांच्या हरुनी
लोकांचें सर्वस्व असे
लोकां देउनि टाकुं कसे'

पुढें दोन वर्षांनीं लिहिलेल्या 'कवनें' या कवितेचा शेवट त्यांनीं असा केला आहे—

'धनीजनांशीं झुंज खेळुनी
क्षणभर ज्यांना आली ग्लानी
त्यांना आम्हीं गाऊं गाणीं
ऐकुनि जीं चवताळुनि लढतिल
आणि स्थापितिल सत्ता अपुली

१९३२ मध्यें लिहिलेली त्यांची 'दोन देवभक्त' ही कविता ढोंगी श्रीमंतांविषयीं कवीला वाटणारा तिरस्कार, त्यांच्या चरकांत पिळल्या जाणाऱ्या असहाय गरिबांच्या विषयीं त्यांच्या अंत:करणांत असलेला जिव्हाळा आणि देवाधर्मावरल्या ज्या अंधश्रद्धेमुळें आजपर्यंत ही अघोर विषमता नांदूं शकली तिच्याविरुद्ध कवीनें उपसलेलें हत्यार, या सर्व

दृष्टींनीं वाचनीय आहे. ही कविता लिहिणाऱ्या काणेकरांच्या मनांत विचारांचा आणि भावनांचा जो नवा कल्लोळ निर्माण झाला होता, तोच १९३३ सालीं 'पिकलीं पानें' या त्यांच्या पहिल्या लघुनिबंध-संग्रहांत प्रकट झाला. त्यांचें निबंधलेखन आत्मनिष्ठ कल्पनेच्या किंवा भावनेच्या विलासांतून स्फुरलेलें नाहीं; तें सामाजिक जाणिवेच्या प्रक्षोभांतून निर्माण झालें आहे.

• • •

'पिकलीं पानें', 'शिंपले आणि मोती', 'तुटलेले तारे', व 'उघडचा खिडक्या' या १९३४ ते १९४५ च्या दरम्यान प्रसिद्ध झालेल्या काणेकरांच्या लघुनिबंध-संग्रहांतल्या अनेक निबंधांत त्यांचें हें प्रभावी वैशिष्टच दिसून येईल. 'पाऊस', 'जुनीं पुस्तकें', 'न वाचलेल्या ग्रंथांची गोडी', 'सहल' असल्या विषयांवर फडके ज्या वेळीं गोड गुजगोष्टी लिहीत होते त्याच वेळीं काणेकर 'छोटे चोर आणि मोठे चोर', 'एकाला जें अमृत तें दुसऱ्याला विष', 'धर्माचे उपयोग', 'तत्त्वांचा पाया' असले लघुनिबंध लिहून आजच्या समाजरचनेंतल्या आर्थिक विषमतेवर आणि धार्मिक दंभावर खुसखुशीत कोरडे ओढीत होते. मधुरता हा फडक्यांच्या 'गुजगोष्टीं' चा आत्मा मानला तर प्रखरता हा काणेकरांच्या लघुनिबंधांचा प्राण आहे असें म्हणणें चुकीचें होणार नाहीं. 'पिकलीं पानें' लिहितांना सामाजिक जाणिवेनें त्यांचें मन इतकें भारावून गेलें होतें कीं 'आळस आणि उद्योग' यासारख्या गमतीदार विषयांवर लिहितांनासुद्धां शेवटीं ते एकदम गंभीर झाल्यावांचून राहात नाहींत. या निबंधाचा प्रारंभ त्यांनीं असा केला आहे— 'एका प्रख्यात आळश्याची अशी गोष्ट सांगतात कीं, तो एकदां बोरें खात बसला होता. बोरें तोंडांत टाकतांना एक बोर त्याच्या मिशींत अडकलें. तेव्हां समोरून जाणाऱ्या एका गृहस्थाला त्यानें हांक मारली आणि 'माझ्या मिशींतलें हें बोर जरा तोंडांत ढकला हो, म्हणून त्याला विनंती केली.'

या गुदगुल्या करणाऱ्या प्रारंभाला साजेल असाच त्यांनीं पुढें या निबंधाचा विकासहि केला आहे. जगाचा खरा उद्धार आळश्यांच्याच हातून होतो, असें प्रतिपादन करून आपल्या या मताचें समर्थन त्यांनीं मोठ्या मजेदार रीतीनें

केलें आहे. 'उद्योग करा' 'उद्योग करा' म्हणून अहोरात्र उपदेश करणारांची टर उडविण्याकरितां कुदळ घेऊन सासऱ्याच्या घराच्या भिंती पाडण्याचा उद्योग करणाऱ्या जांवईबुवांची एक गोष्टहि त्यांनीं सांगितली आहे. मात्र इथपर्यंत हंसत खेळत असलेले काणेकर एकदम गंभीर बनून या निबंधाचा शेवट असा करतात— 'सध्यांची समाजव्यवस्था जेव्हां मी डोळे उघडून पहातों तेव्हां 'उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मीः' हें तत्त्व अजिबात खोटें आहे, अशी माझी बालंबाल खात्री पटते. माझ्या दृष्टीला उद्योगी पुरुषसिंहाचीं पोटें पाठीला लागलेलीं दिसतात आणि पैसेवाले निरुद्योगी पुरुषहत्ती मात्र आपलें लंबोदर गोंजारीत गादीवर पडलेले दिसतात. भरल्या पोटावर ढेंकर देत एकादा पंडित, मरमर काम करूनहि उपवासानें वळवळणाऱ्या मजुराला जर वरील तत्त्व समजावून देऊं लागला, तर मला वाटतें, मजुरी करणारा तो पुरुषसिंह या पंडिताचें गंडस्थळ फोडल्याशिवाय राहणार नाहीं.'

काणेकर प्रचारक लघुनिबंधकार आहेत, असें म्हणण्याचा मोह चांगल्या टीकाकारांनासुद्धां होतो याचें कारण अशा कलाहीन रीतीनें मधून मधून दृग्गोचर होणारा त्यांचा हा सामाजिक प्रक्षोभच आहे. पण जरा खोल जाऊन पाहिलें म्हणजे काणेकरांच्या लघुनिबंधाचा पाया प्रचलित विचारांचा प्रचार नसून जीवनदर्शनांतून निर्माण झालेलें तत्त्वचिंतन आहे असें दिसून येईल. कल्पनेचा किंवा भावनेचा एकादा सूक्ष्म साधा धागा हातीं घेऊन कोळी जसा आपलें जाळें विणतो, तशा नाजुकपणानें त्यांनीं निर्माण केलेले निबंध फार थोडे आहेत, हें कांहीं खोटें नाहीं. तें आपल्या भोंवतालचें सामाजिक जीवन सूक्ष्म नजरेनें न्याहाळतात, त्यांतल्या लहानमोठ्या ढोंगासोंगांचा मार्मिक (आणि कधीं कधीं मर्मभेदक) रीतीनें स्फोट करतात, आणि जातांजातां तुम्हांआम्हांला पटलेलें पण बोलून दाखविण्याचें धैर्य नसलेलें एकादें तत्त्व परिणामकारक रीतीनें वाचकांच्या गळीं उतरवितात.

अगदीं साध्या विषयांतलें किंवा अनुभूतींतलें उपेक्षित सौंदर्य हंसतखेळत प्रकट करून दाखविणें हेंच लघुनिबंधाचें मुख्य कार्य आहे, असें मानणारी मंडळी तत्त्वचिंतन हा लघुनिबंधाचा आत्मा होऊं शकत नाहीं असें म्हणतात. लघुनिबंध हा बिया नसलेल्या काबुली द्राक्षासारखा असावा असें

त्यांना वाटतें. पण काणेकरांचा लघुनिबंध आंब्यासारखा आहे. त्यांत भली मोठी कोय असते. ती कोय कांहीं कुणाला खातां येत नाहीं हें खरें; पण तिच्याभोंवतींच त्या आंब्यांतला सारा मधुर रस दाटलेला असल्यामुळें ती चोखतांना काबुली द्राक्षें जिभेवर घोळविण्याइतकाच आस्वादकाला आनंद होतो. लघुनिबंधांत ओढून ताणून आणलेलें तत्त्वदर्शन रसपरिपोषक होऊं शकत नाहीं, हें मी मान्य करतों. विकसित व्यक्तित्व आणि त्याचा आविष्कार करायला लावणारें कौशल्य यांच्या अभावामुळें आपले अनेक लेखक वडाची साल पिंपळाला लावावी त्याप्रमाणें लघुनिबंध लिहितांना त्याला कृत्रिम तत्त्व-दर्शनाचा मुलामा देऊन या वाङ्मयप्रकाराविषयीं अनेक गैरसमज निर्माण करायला कारणीभूत झालेले आहेत. पण हें सारें खरें असलें तरी स्वभावत: चिंतनशील असलेल्या लेखकाच्या स्वच्छंद आत्माविष्कारांतून वाचकांना तत्त्व-दर्शन व्हावें यांत अस्वाभाविक असें काय आहे ? लघुनिबंधाचा जनक मानला जाणारा फ्रेंच लेखक माँटेन याचें लिखाण आपण पाहिलें तर तें भावना अथवा कल्पना यांच्यापेक्षां विचारावरच अधिष्ठित झालें आहे असें आढळून येईल. माँटेन 'संभाषण' व 'प्रवास' या विषयांप्रमाणें 'क्रांति' व 'यादवी' या विषयांवरही लिहितो. अशा अनंत विषयांवर आपलें मनोगत तो कुठल्याही प्रकारचा आडपडदा न ठेवतां प्रकट करतो. लघुनिबंधाचा आत्मा लेखकाच्या या मोकळेपणांत आहे असें मला वाटतें. एकाद्या विषया-विषयीं लोकांना काय वाटतें याचा लघुनिबंधलेखक कधींच विचार करीत नाहीं. उलट त्याविषयीं आपल्याला काय वाटतें हें तो जगाला सांगत सुटतो. आणि तेंहि कशा रीतीनें ? तर या पृथ्वीवरली प्रत्येक व्यक्ति आपला जिवाभावाचा मित्र आहे अशा भावनेनें.

तत्त्वदर्शन हें लघुनिबंधाच्या आत्म्याशीं विसंगत आहे असें प्रतिपादन करणारांनीं आणखी एका लेखकाचें लिखाण अवश्य वाचून पहावें. तो लेखक 'रिचर्ड किंग' हा होय. या आधुनिक इंग्रज लघुनिबंधकाराचे संग्रह आपण चाळूं लागलों तर 'शिष्टाचाराला शोभेल अशा रीतीनें 'खाण्याची कला' या विषयापासून 'हुकुमशाही आणि लोकशाही' यासारख्या विषयांपर्यंत सर्वत्र त्याची लेखणी सलील संचार करीत असलेली

दिसून येईल. त्याच्या अनेक निबंधांत आपल्याला फक्त मार्मिक व मजेदार विचारांचें स्वैर दर्शन होतें. पण या विचारांत त्याची तीव्र बुद्धि, सूक्ष्म विनोद-दृष्टि आणि मानवतेवरल्या गाढ प्रेमानें भरलेलें त्याचें हृदय या सर्वांचा इतका मधुर संगम आढळतो कीं, आपण न कळत—अगदीं रमत गमत— त्याच्या तत्त्वदर्शनांत समरस होतों. त्याच्याविषयीं एक टीकाकार म्हणतो :

'Mr. Richard King has won his way to the hearts of thousands of readers by his gift of intimate, sympathetic converse on all sorts of subjects that crop up in the main roads or the by-paths of life. He is one of the masters of the causerie.'

(आपल्या जिव्हाळयाच्या आणि सहानुभूतिपूर्ण अशा स्वैरालापांनीं किंग हा हजारों वाचकांचा आवडता लेखक झाला आहे. जीवनाचे राजमार्ग घ्या अथवा त्या मार्गाला फुटलेल्या अनेक पाऊलवाटा पहा. सर्वत्र पसरलेले विविध विषय रंगविण्यांत किंगची लेखणी कुशल आहे. स्वैर निबंध लिहिणारा तो एक सिद्धहस्त लेखक आहे.)

थोडाफार फरक करून मराठीपुरतें काणेकरांचेंहि असेंच वर्णन करतां येईल गंभीर निबंधांचे विषय लघुनिबंधाच्या आत्मनिष्ठ पद्धतीनें हाताळणें हें कांहीं येरा गबाळाचें काम नाहीं, लेखकाच्या अंगीं विविध वाङ्मयगुण असल्या-शिवाय त्याला या कामांत यश मिळणें जवळजवळ अशक्य आहे.

● ● ●

पण काणेकरांनीं तें यश मिळविलें याचें कारण त्यांच्या वाङ्मयीन व्यक्ति-त्वाची बैठक केवळ प्रचारकाची नाहीं. ती कलावंताचीहि आहे. 'सुखस्वप्नांचे कारखानदार' आणि 'देवदारु व चक्रवाक्' हे या संग्रहांतले दोनच निबंध वाचले तरी त्यांच्या सौंदर्यपूजक वृत्तीचें दर्शन वाचकाला झाल्यावांचून राहाणार नाहीं. आजच्या समाजरचनेंतल्या विषमतेवर आणि मानवी मनांतल्या ढोंगांसोंगांवर ते कडकडून हल्ला चढवितात याचें कारण तरी जगाला विद्रूप करणाऱ्या या गोष्टी त्यांना अगदीं असह्य होतात, हेंच आहे ना? त्यांना भावनेचें वावडें

नाहीं. पण भावनेनें व्याकुळ किंवा विवश होऊन जाणें हें त्यांच्या वृत्तींतच नाहीं. त्यामुळें त्यांच्या सौंदर्यदृष्टीचें स्वरूप जसें मुख्यत: सामाजिक झालें आहे, त्याचप्रमाणें त्यांच्या निबंधरचनेंतहि एक प्रकारचा अतिरिक्त संयम– कधीं कधीं निबंधाला साचेबंद स्वरूप आणून त्याची रसहानि करणारा संयम – निर्माण झाला आहे. या संयमामुळेंच ते कवि असूनहि त्यांच्या लघुनिबंधांत काव्याचा विलास फारसा आढळत नाहीं. त्यांची भूमिका कवीची नसून टीकाकाराची आहे. त्यामुळें कधीं गुदगुल्या करून, कधीं चिमटे काढून तर कधीं कधीं कोरडे लगावून रूढ सामाजिक अन्यायांपासून मानवी स्वभावांतल्या विविध दोषांपर्यंत प्रत्येक गोष्टीवर ते टीका करीत असतात. त्यांच्या या टीकेमधून जें जीवनदर्शन होतें तें वाचकाला जितकें रिझवतें तितकेंच अंतर्मुखहि करतें.

समाज आणि जीवन यांच्यावरली टीका हें काणेकरांच्या लघुनिबंधाचें वैशिष्टय असूनहि ते रूक्ष, गंभीर किंवा निव्वळ हेतुप्रधान होत नाहींत, याचें अर्धेअधिक श्रेय त्यांच्या विनोदाला दिलें पाहिजे. बाणाच्या तीक्ष्ण टोंकाला पिसें लावावींत तसा त्यांच्या लघुनिबंधांतला विनोद आहे. तो नुसती खसखस पिकवीत नाहीं; तर नाजुक गुदगुल्या करून शहाणपण शिकवितो. आख्यायिका, दंतकथा, चुटके इत्यादिकांचा मोठ्या चतुराईनें उपयोग करून काणेकरांनीं आपल्या विनोदाला जशी लज्जत आणली आहे, त्याप्रमाणें उपहास, उपरोध इत्यादिकांचा योग्य स्थळीं उपयोग करून त्यांनीं त्यांचें सामर्थ्यहि व्यक्त केलें आहे. त्यांच्या या विनोदी बुद्धीचें अत्यंत सुंदर अपत्य म्हणजे त्यांच्या लघुनिबंधांतून वावरणारे गणूमामा. ॲडिसनचा सर रॉजर डी कॉव्हर्ले किंवा वामनराव जोश्यांचे प्रो. धोंडोपंत वर्वे यांच्याप्रमाणें काणेकरांचे गणूमामा – ते सनातनी असूनसुद्धां – वाचकांना नेहमींच प्रिय होऊन राहतील.

ही विनोदबुद्धि तत्त्वदर्शनाच्या सासुरवासांतून मोकळी झाली म्हणजे तिचा जो स्वच्छंद विहार चालतो, तो त्यांच्या लघुनिबंधांचा एक रमणीय विशेष आहे. 'घड्याळाचे गुलाम' किंवा 'यथेच्छ झोपा' हे या संग्रहांतले दोन निबंध वाचले किंवा या संग्रहांत न घेतलेले 'अज्ञानाचा

आनंद' 'व्यवस्थितपणाचें वेड' अशासारखे त्यांचे निबंध पाहिले, म्हणजे काणेकरांनीं असले खूप निबंध लिहायला हवे होते, असें वाटू लागतें. त्यांच्या स्वभावांत गांभीर्याइतकाच—किंबहुना कांकणभर अधिकच—मिस्किलपणा आहे. त्यामुळें आपल्या लघुनिबंधांत जीवनाकडे पहाण्याचा वास्तववादी दृष्टिकोण जसा त्यांनीं परिणामकारक रीतीनें मांडला आहे, तसा या खेळकर पद्धतीनें विविध विसंगतींचा त्यांना मनसोक्त समाचार घेतां आला असता.

लघुनिबंधाचे विषय, त्यांचा आशय आणि त्यांची आटोपशीर पण परिणामकारक मांडणी यांना शोभेल अशीच काणेकरांची भाषा आहे. ती साधी असली तरी भोळीभावडी नाहीं. ती नेहमीं आत्मविश्वासानें बोलते. ती जशी नटवी लक्ष्मी नाहीं तशी अगदीं लंकेची पार्वतीहि नाहीं. सुभाषितें बनविण्याचा तिला छंद नाहीं. पण प्रतिपादनाच्या ओघांत ती असें एकादें चटकदार वाक्य लिहून जाते कीं, वाचक कितीतरी वेळ त्याच्या सुंदर आत्म्याचें चिंतन करण्यांत गुंग होऊन जातो. 'मोहाला बळी पडूं नये हें सांगणें जितकें सोपें आहे, तितकेंच मोहाला बळी न पडणें हें कठिण आहे.' 'आपण सर्वच एकेरी दृष्टिकोणानें जगाकडे पहात असतों आणि एकेरीवर येत असतों,' 'सर्व जग जर तालबद्ध पावलें टाकीत असतें तर उदयशंकरला कोण विचारणार होतें?' 'माणूस मरतो; पण मानवता जगते,' असल्या वाक्यांचा कुणाला विसर पडेल?

काणेकरांच्या लघुनिबंधाचा आणखी एक विशेष अवश्य लक्षांत ठेवला पाहिजे. तो म्हणजे त्यांचा आशावाद! ते सध्यांच्या समाजरचनेवर कडाडून टीका करतील, मनुष्यप्राणी किती स्वार्थी, ढोंगी आणि मूर्ख आहे, हें हडसून खडसून सांगतील. पण त्यांच्या या सर्व उद्गारांत जीवनाविषयींची निराशा, अश्रद्धा किंवा विफलता यांची पुसट छायासुद्धां कुठें दिसणार नाहीं. त्यांचे लघुनिबंध वाचतां वाचतां वाचकाला जशी जीवनाकडे पाहण्याची वास्तवदृष्टि लाभते, त्याप्रमाणें तें जीवन निर्दोष, आनंदी आणि प्रगतिपर करण्याचा उत्साहहि त्याच्या मनांत निर्माण होतो.

या संग्रहांत समाविष्ट केलेल्या काणेकरांच्या लघुनिबंधांचें रसग्रहण करणें विद्यार्थ्यांना सुलभ जावें, म्हणून त्यांतल्या कांहीं विशेषांविषयीं मीं वर थोडेंसें लिहिलें. पण एखाद्या मनुष्याच्या गुणदोषांविषयीं दुरून माहिती मिळविणें निराळें व त्याच्या निकट सहवासांत आणि सुखद संभाषणांत गुंग होऊन जाणें निराळें. काणेकरांचे लघुनिबंध वाचतांना शास्त्र, तंत्र, चिकित्सा, गुणदोषमीमांसा इत्यादि शब्द वाचकाला आठवतच नाहींत. असें होण्याचें कारण तसेंच महत्त्वाचें आहे. त्यांच्या लघुनिबंधांत कोणतेहि गुणदोष असोत ते वाचतांना ‘ Who touches a book touches a man ’ या व्हिटनच्या उक्तीचा आपल्याला अनुभव आल्यावांचून राहात नाहीं. चांगल्या वाङ्मयाची यापेक्षां सर्वमान्य अशी दुसरी कुठली कसोटी आहे ?

शाहुपुरी, कोल्हापूर<br>ता. १–६–४७

वि. स. खांडेकर

## अनुक्रम

# दोन मेणबत्त्या १

## परिचय

मनुष्य कशासाठीं जगतो किंवा माणसाच्या आयुष्यांतला अत्यंत सुखाचा क्षण कोणता असा प्रश्न जर आपणाला कुणीं विचारला तर आपण गोंधळून जाऊं यांत संशय नाहीं. आपण म्हणूं, 'हे अवघड प्रश्न पंडितांनीं सोडवावेत. यांचीं उत्तरें तत्त्वज्ञांनीं द्यावींत. सर्कशींतल्या प्रचंड गोल पिंजऱ्यांत एकाद्या भिंगरीप्रमाणें मोटार-सायकल फिरविणें हें कांहीं येरागबाळाचें काम नव्हे!'

एक श्रीमंत पण स्वतःच्या संकुचित सुख दुःखांत बुडून गेलेला मित्र आणि दुसरा गरीब पण जगाच्या विशाल सुखदुःखाशीं समरस झालेला मित्र अशा दोन व्यक्ति या लघुनिबंधांत जवळ जवळ उभ्या करून लेखक म्हणतो, 'हें चित्र पाहा नि हें चित्र पाहा म्हणजे या प्रश्नांचीं उत्तरें किती सोपीं आहेत हें तुम्हांला समजेल. जो स्वतःसाठीं जगतो तो जिवंत असून मेल्यासारखाच आहे; जो दुसऱ्यासाठीं जगतो तोच या जगांत मरणावर मात करतो.'

● ● ●

स्वाक्षरी घेण्याकरितां म्हणून माझ्याकडे त्या दिवशीं आलेल्या त्या मुलानें मला खरोखरच मोठ्या पेचांत टाकलें. द्यावी स्वाक्षरी आणि एकदां मोकळें व्हावें म्हणून त्याच्या हातांतलें पुस्तक घेऊन मी सही करणार तों तो एकदम म्हणाला, "छे, छे, मला नुसती स्वाक्षरी नको; माझा एक प्रश्न आहे, आणि त्याला उत्तर म्हणून पांचसहा ओळी लिहून नंतर तुम्ही सही केली पाहिजे."

"कसला प्रश्न?" मी म्हणालों.

"मनुष्याच्या आयुष्यांतला अत्यंत सुखाचा क्षण कोणता?" तो पोरगा गंभीरपणें उद्‌गारला, "या प्रश्नाला एक चारपांच ओळींचं उत्तर लिहा, आणि नंतर सही करा."

त्याचा प्रश्न ऐकून मी थक्कच झालों. "अरे बाबा," मी म्हणालों ज्या प्रश्नाचं उत्तर देतांना मोठमोठ्या तत्त्वज्ञान्यांच्यासुद्धां नाकीं नऊ आले त्या

प्रश्नाचं उत्तर तूं माझ्याकडे मागतोस? काय वेड लागलंय तुला? मला नाहीं कांहीं उत्तर देतां येत या प्रश्नाचं. पाहिजे तर सही घे आणि जा."

"तत्त्वज्ञान्यांचीं मतें मला नको आहेत." तो म्हणाला, "तुमच्यासारख्या लोकांचींच हवीं आहेत. तुम्हांला काय वाटेल तें लिहा. हीं पहा, पुष्कळ लोकांनीं या प्रश्नाला उत्तरें लिहिलीं आहेत."

"मी नाहीं त्यांच्याइतका शहाणा." मी त्रासून म्हणालों, "मला खरंच कांहीं सुचत नाहीं. काय थट्टा आहे काय अशा प्रश्नाचं तावडतोब उत्तर द्यायचं म्हणजे?"

"आत्तांच देऊं नका." तो काकुळतीला येऊन म्हणाला, "ही चोपडी इथंच राहूं द्या. मी उद्यां येतो, परवा येतो—तुम्ही सांगाल तेव्हां येतो."

त्या हुशार छोकऱ्याच्या पाणीदार डोळ्यांत इतकी कळकळ दिसत होती, कीं मला नाहीं म्हणवेना. "वरं, वरं ठेवून दे ती चोपडी इथं." मी म्हणालों, "आणि ये उद्यां परवां."

त्या दिवशीं दुपारपर्यंत मी कामांत असल्यामुळें त्याच्या प्रश्नाचा विचार करायला मला वेळच झाला नाहीं. पण त्यानंतर संध्याकाळीं एकामागून एक तीन प्रसंग घडले. ते मात्र माझ्या मनांत घोळत असलेल्या त्या प्रश्नाचें उत्तर घेण्याकरतांच घडले असें आतां मला वाटतें. खूप श्रीमंत असलेल्या माझ्या ओळखीच्या एका गृहस्थाकडे कांहीं कामाकरितां मी गेलों. तो घरीं नव्हता. त्याची वायको चिंतातुर चेहरा करून बसली होती.

"काय हो, कुठं गेले?" मी विचारलें.

"तो नवीन जर्मन डॉक्टर आला आहे ना, त्याच्याकडे गेलेत. मींच जा म्हणून आग्रह करून पाठवलं त्यांना." ती म्हणाली.

"म्हणजे? झालं काय?" मी म्हणालों.

"अहो, काय नी काय! त्यांच्या मागली एक काळजी जाते तर दुसरी लागते! खडकीच्या बंगल्याची राखण करायला पठाण ठेवला; तो पठाणच चोरी करून पळाला! तें तुम्हांला माहितच आहे. ती भानगड संपली नाहीं तों आतां इन्कमटॅक्सची केस उभी राहिली आहे. त्यांना अलीकडे झोंपसुद्धां कशी ती लागत नाहीं. अन्नपाण्यावर तर वांछाच नाहीं. तेव्हां मी म्हटलं, निदान त्या नवीन डॉक्टरच्या औषधानं तरी जरा बरं वाटेल."

"अस्सं होय ?" मी म्हणालों.

तिथून निघालों तों आगगाडींत बसून मी घरीं परत येत होतों. मजूर चळवळींत काम करणारा माझा एक जुना मित्र डब्यांत भेटला. खूप आनंदांत होता तो. आपलं काम कसं शिस्तींत चाललं आहे आणि चळवळीला कसा जोर चढतो आहे याचें रसभरीत वर्णन करीत असतां त्याच्या डोळ्यांत विलक्षण चमक दिसत होती. त्याचे डोळे खोल गेले होते आणि त्याची दाढीहि वोटभर वाढली होती.

"तुझे डोळे किती खोल गेलेत!" मी म्हणालों, "काय झालंय रे तुला?"

"हट्" तो उद्गारला "मला काय झालंय ? मी चांगला मजेंत आहे. डोळे खोल गेले आहेत कीं वर आले आहेत तें मला माहीत नाहीं. गेल्या पंधरा दिवसांत आरशांत तोंड पाहायला मला वेळच झाला नाहीं. आतां दाढीविषयीं म्हणशील तर दाढी करायला सध्यां आपल्या खिशांत पैसे नाहींत बुवा !"

इतक्यांत परळ स्टेशन आलें; आणि माझ्याशीं हस्तांदोलन करून मोठ्या चैनींत शीळ घालीत तो तिथून निघून गेला.

एकामागून एक घडलेल्या या दोन प्रसंगांचें मला मोठें आश्चर्य वाटत होतें. स्वतःच्या अपरंपार सुखांत आणखी भर घालण्याकरितां इन्कमटॅक्स चुकवून पंधरा लाखाचे सोळा लाख करण्याकरतां जीव पाखडणारा, आणि ठिकठिकाणच्या अनेक बंगल्यांत हजारों रुपयांचें फर्निचर धूळ खात पडलेलें असतांना खडकीच्या बंगल्यांतलीं चार खुर्च्याटेबलें पठाणानें पळवलीं म्हणून हाय खाणारा आमचा हा श्रीमंत दोस्त दुःखी आणि चिंताग्रस्त ! आणि एम्. ए. झाल्यावर घरीं चालत आलेल्या लठ्ठ पगाराच्या नोकऱ्या लाथाडणारा, आणि कधीं काळीं दलित जनता स्वतंत्र होऊन सुखी होईल म्हणून स्वतःच्या सुखाची यत्किंचितहि पर्वा न करतां इतरांच्या सुखासाठीं कधीं उपाशी तर कधीं अर्धपोटीं वणवण फिरणारा हा कॉम्रेड मजेंत आणि सुखी !

हे आणि असेच दुसरे विचार करीत मी रात्रीं घरीं परत आलों. आणि तो तिसरा प्रसंग घडला. मला मेणबत्तीच्या थंड प्रकाशांत वाचीत बसणें फार आवडतें. म्हणून खुर्चीवर उभा राहून फळीवरल्या मेणबत्त्या मी शोधूं लागलों. एक मेणबत्ती सबंध जळून गेलेली होती. मेणबत्ती अशी क्वचितच जळते. तिचें अस्तित्व दाखविण्यापुरता फक्त पैशाएवढा मेणाचा अवशेष

शिल्लक होता; दुसरी मेणबत्ती कित्येक दिवस फळीवर धूळ खात पडल्यामुळें मुंग्याझुरळांनीं ती सबंध कुरतडून अजिबात निरुपयोगी केली होती. तशा स्थितींत पडलेल्या दोन मेणबत्त्या पाहून, कां कुणास ठाऊक, मला थोडेंसें हसू आलें; आणि दुसऱ्याच क्षणीं एक चमत्कारिक विचार माझ्या डोक्यांत आला. ज्या दोन माणसांचा मी विचार करीत होतों तीं दोन माणसें या दोन मेणबत्त्यांसारखीं आहेत! आपला जीव निर्धोक ठेवण्यांत—स्वत:च्या सुखाची राखण करण्यांत गुंतून पडलेल्या एकाचें आयुष्य कुरतडलें जात आहे, आणि इतरांना मंद, सुखकर प्रकाश देत दुसऱ्याची जीवनज्योत जळत चालली आहे.

समजा, त्या मेणवत्त्यांना जीव असता तर आपला कुणाला कसलाच उपयोग झाला नाहीं— आपलें आयुष्य कुजून गेलें, हा दु:खमय विचार मरतां मरतां एकीच्या मनांत आला असेल; आणि आपल्या जीवनाचें सार्थक झालें--शेवटच्या घटकेपर्यंत आपण सर्वांना प्रकाश दिला या सुखदायी तंद्रींत त्या दुसरीच्या आयुष्यांतला शेवटचा क्षण संपला असेल. मनुष्याच्या आयुष्यांतला अत्यंत सुखाचा क्षण कोणता, या प्रश्नाचें उत्तर त्या मुलाला पाहिजे होतें, नाहीं का? मिळालें मला उत्तर. मनुष्याच्या आयुष्यांतला अत्यंत सुखाचा क्षण, म्हणजे हा अशा प्रकारचा शेवटचा क्षण! टेबलावर पडलेली त्याची चोपडी मीं घेतली, आणि त्यावर लगेच खरडलें, "· · · हा खरा सुखाचा क्षण! स्वत:साठीं जगलास तर मेलास; दुसऱ्यासाठीं जगलास तरच जगलास!"

● ● ●

## अभ्यास

१. या लघुनिबंधांतले लेखकाचे दोन मित्र एकाच वेळीं त्याच्या घरीं त्याला भेटायला येतात अशी कल्पना करून त्या तिघांचें संभाषण लिहा.

२. खांडेकरांचा 'दोन मेणवत्त्या' (सायंकाल) हा लघुनिबंध वाचा.

३. 'स्वत:साठीं जगलास तर मेलास; दुसऱ्यासाठीं जगलास तरच जगलास.' हें ध्येय डोळ्यापुढें ठेवणाऱ्या पण लोकांना सामान्य वाटणाऱ्या अशा एकाद्या तुम्हांला माहीत असलेल्या व्यक्तीचें शब्दचित्र लिहा.

● ● ●

# घड्याळाचे गुलाम २

## परिचय

सद्गुण हा इष्ट खरा; पण व्यवहारांत कुठल्याहि सद्गुणाचा अतिरेक हास्यास्पद झाल्यावांचून राहात नाहीं. स्वच्छता ही वाईट गोष्ट आहे असें कोण म्हणेल? पण स्वच्छतेचें वेड एकाद्या माणसाला लागलें म्हणजे तो उठल्या बसल्या हातपाय धुऊं लागतो, अष्टौ प्रहर हातांत केरसुणी आणि ओलें फडकें घेऊन घरभर साफसफाई करीत सुटतो आणि अंगावरून मोटार जाऊं लागली कीं लगेच धुळीच्या भीतीनें बुद्धभिक्षूप्रमाणें नाकावर हातरुमाल धरून व लोकांकडे पाठ फिरवून तो भर रस्त्यांत खांबासारखा उभा राहतो.

नियमितपणाचें वेडहि असेंच आहे. माझ्या माहितींचे एक गृहस्थ आहेत. दररोज दुपारीं ते बाराच्या तोफेबरोबर चित्राहुती घालतात. एकाद्या दिवशीं घरांत स्वयंपाक लवकर तयार झाला आणि 'पानं वाढलीं आहेत' म्हणून वर्दी आली तर ते घड्याळ घेऊन पाटावर जाऊन बसतात आणि बाराला पांचदहा मिनिटें कमी असलीं तर खुशाल ताटांतला भात गार होऊं देतात. घड्याळांत दोन्ही कांट्यांचें मीलन झालें कीं ते तोंडांत घास घालतात!

विनोद हें एककल्लीपणाच्या डोळ्यांत घालायचें उत्तम अंजन होय असें म्हणतात. त्याच्या साहाय्यानें लेखकानें या लघुनिबंधाला कशी रंगत आणली आहे तें पाहा.

● ● ●

कोणा एका थोर गृहस्थाची आख्यायिका सांगतात, कीं त्याच्या जाण्या-येण्याच्या वेळेवरून लोक घड्याळें लावून घेत असत. मी तरी या गृहस्थाला थोर म्हणण्याऐवजीं घड्याळाचा गुलाम म्हणेन! माणसानें स्वतःच्या सुख-सोयींसाठीं घड्याळाचा शोध लावला, आणि आम्हीं केव्हां काय करावें या संबंधांत घड्याळानें आमच्यावर सोटेशाही चालवावी, हें किती लांछनास्पद!

मी तर या गृहस्थाला स्पष्ट म्हटलें असतें :

"अरे गृहस्था ! अनियमित वागून होतं तरी काय, हें पाहण्याच्या साध्या कुतूहलानं तरी एक दिवस अनियमित वागायचं होतंस !" रोज त्याच वेळीं तेंच करण्याचा काय हा यांत्रिक मठ्ठपणा ! मला वाटतें, 'नेमेचि येतो मग पावसाळा। हें सृष्टिचें कौतुक जाण बाळा।' हें प्रख्यात काव्य रचणारा महाकवि या लोकांचा गुरु असावा ! नेमलेल्या वेळीं विनचूक पावसाळा येतो यांत कौतुक कसलें ? नेमलेल्या वेळीं न आला तरच कौतुक ! सूर्य रोज उगवतो त्याचें कुणालाच कौतुक वाटत नाहीं. पण तोच धूमकेतु केव्हां तरी अचानकपणें आकाशांत सुळकांडी मारून जातो, त्याचें किती कौतुक वाटतें ! त्याचप्रमाणें सूर्य एखादे दिवशीं न उगवेल तर खरें कौतुक !

अनियमितपणानें आयुष्याला येणारें वैचित्र्य किंवा अचानकपणाची ख़ुमारी या वक्तशीर लोकांना जन्मांत चाखावयाला मिळावयाची नाहीं. या अचानकपणावरून मला एक मोठी गमतीची गोष्ट आठवते. एक गृहस्थ माझी नेहमीं स्तुति करीत असे; आणि स्तुति कुणाला आवडत नाहीं ? साहजिकच तो मनुष्य मोठा भला आहे अशी माझी कल्पना होती, आणि माझेविषयींहि त्याचें फार चांगलें मत आहे असें मला वाटत होतें. एकदां त्यानें मला तीन वाजतां चहाला बोलाविलें होतें. पण कांहीं कारणामुळें मी अडीच वाजतांच अचानकपणें त्याच्या दाराशीं पोहोंचलों. मी आल्याची चाहूल आंत लागली नव्हती. त्यामुळें जोडा काढीत असतां माझ्यासंबंधीं पुढील उद्गार तो आपल्या दुसऱ्या एका मित्राशीं काढीत असलेले माझ्या कानांवर पडले, "ती पीडा येईल आतां तीन वाजतां ! खरं म्हटलं तर मी त्याला बोलावणार नव्हतों आज, पण म्हटलं वकील आहे. उपयोग होतो केव्हां केव्हां फुकटांत नोटिसा द्यायला ! "

मी पाय न वाजवितां मागच्याच पावलीं घरीं परत आलों. दुसऱ्या दिवशीं हा गृहस्थ मला रस्त्यांत भेटला. तेव्हां या कानापासून त्या कानापर्यंत हंसतमुख करून तो अगदीं कळवळयानें म्हणाला, "काल आलांत नाहीं तुम्ही, विरस झाला आमचा अगदीं !"

"अस्सं !" मी म्हणालों.

वरील गोष्टीवरून मात्र जर कुणी अनियमित वागण्याचा नियम करील, तर

तेंहि अनियमितपणाच्या सर्व दोषांमुळें तितकेंच कंटाळवाणें होईल. असाच एक गृहस्थ आहे. त्याला तुम्ही जर पांच वाजतां चहा प्यावयास बोलावलेंत तर तो नेमका सहा वाजतां यावयाचा ! त्याचा हा अनियमितपणा इतका नियमित झाला आहे, कीं त्याला पांच वाजतां चहाला बोलवावयाचें असल्यास आम्ही त्याला बरोबर चार वाजतां ये म्हणतों, एवढेंच. असल्या अनियमितपणांत कांहींच अर्थ नाहीं.

वक्तशीरपणावरचे वक्ते नेहमीं कंठरवानें सांगतात, कीं नेपोलियनच्या रणांगणावरील यशाची गुरुकिल्ली हीच, कीं तो नेहमीं ठरलेल्या वेळेच्या आधींच दहा मिनिटें रणांगणावर हजर असायचा. पहिली गोष्ट ही कीं, दहा मिनिटें आधीं हजर राहणें, हा म्हणजे वक्तशीरपणाच नव्हे. दुसरी गोष्ट अशी कीं, तो जर नियमितपणें दहा मिनिटें आधीं येत असे, तर त्याच्या शत्रूंनीं फक्त एकच गोष्ट करावयाची. नेपोलियनच्या येण्याचा वेळ कळला कीं, त्याच्या आधीं पंधरा मिनिटें रणांगणावर ठाण मांडावयाचें ! पण माझ्या मतें ही आख्यायिकाच मुळीं अजिबात खोटी असावी. नेपोलियन इतका मूर्ख असता, तर तो कधींच यशस्वी झाला नसता. मला वाटतें, केव्हां केव्हां ठरलेल्या वेळेच्या आधींच दहापंधरा मिनिटें, तर कधीं कधीं दोन तीन तास उशीराच तो रणांगणावर जात असावा ! व त्यामुळें त्याचे शत्रू गोंधळून जाऊन पराजित होत असावेत. नाहीं तर साडेतीनची वेळ असली कीं हा तीन वाजून वीस मिनिटांनींच रणांगणावर येणार हें माहीत असून सुद्धां ते जर वेळेवर येत नव्हते, तर ते शत्रुच बावळट असले पाहिजेत; आणि असल्या बावळटांवरच जर नेपोलियननें विजय मिळविले असतील, तर त्यांत मला तरी त्याचा कांहीं मोठेपणा दिसत नाहीं !

नेपोलियनची गोष्ट कशाला ? मीं स्वतः असल्या डावपेंचांनीं माझ्या शत्रूंचे हल्ले परतविले आहेत. एकदां माझा एक शाळेंतला दोस्त किती तरी वर्षांनीं रस्त्यांत भेटला. बोलतां बोलतां आपण सध्यां एका विमाकंपनीचे एजंट आहोंत, हें तो बोलून गेला. आणि कांहीं वेळानें त्यानें सहज प्रश्न केला कीं, "तूं घरीं केव्हां असतोस रे ?" या साध्या प्रश्नाच्या मागून डोकावत असलेला त्याचा पापी हेतु माझ्या तेव्हांच ध्यानांत आला ! शाळेंत दोस्ती केल्याच्या अपराधाबद्दल हा माझा असा सूड घेईल, असें मला

वाटलें नव्हतें ! मीं त्याला हंसत हंसत उत्तर दिलें, "सकाळीं आणि संध्याकाळीं बहुतेक असतों मी घरीं." त्या दिवसापासून आपल्या सर्व कामाकरितां सकाळसंध्याकाळ बाहेर फिरावयाचें, व फक्त दुपारीं आणि मध्यरात्रीनंतर घरीं राहावयाचें, असा परिपाठ मी सुरूं केला. त्या अवधींत बरेच वेळां तो घरीं येऊन गेल्याचें मला कळलें. इतक्यांत एका भयंकर विचारानें माझ्या छातींत धस्सदिशीं गोळा आला. काय हा आपण भलताच नियमित अनियमितपणा चालवला आहे ! एकदम आपले जुने डावपेंच बदलून हा एखाद्या दिवशीं दुपारींच घरीं आला तर ? पुन्हां दुसऱ्या दिवसापासून मी नवा कार्यक्रम सुरू केला. सकाळसंध्याकाळ घरीं राहावयाचें व दुपारीं बाहेर फिरावयाचें. नेपोलियनपेक्षांहि माझे हे डावपेंच कल्पनातीत यशस्वी झाले आणि आजतागायत माझा विमा उतरलेला नाहीं !

नाहीं तर आपण आपले जातों आहोंत रोज वेळच्या वेळीं, आणि लोक लावताहेत आपलीं घड्याळें आमच्या जाण्यायेण्यावर !

● ● ●

## अभ्यास

१. फडके यांचा 'अज्ञानाची महती' (गुजगोष्टी) व काणेकर यांचा 'व्यवस्थितपणाचें बंड' (पिकलीं पानें) हे लघुनिबंध वाचा.

२. 'आज साऱ्या जगावर माझं राज्य चाललं आहे' असें घड्याळानें अभिमानानें म्हटलें तर तें चूक होईल काय ? अशी दर्पोक्ति काढणाऱ्या चौकांतल्या एका घड्याळाचे उद्गार लिहा.

३. या लघुनिबंधांतल्या कोणत्या विनोदी कल्पना तुम्हांला आवडल्या व त्या कां आवडल्या हें सांगा.

● ● ●

# अमृत आणि विष ३

## परिचय

आपल्या आजच्या समाजव्यवस्थेंत अधिक विषमतेचें थैमान जिथें तिथें सुरू आहे. मुंबईसारख्या शहरांत मोठमोठ्या तीन तीन मजली बंगल्यांत नोकरचाकर धरूनसुद्धां पुरीं दहावीस माणसें राहात नाहींत ! पण रात्रीं फूटपाथच्या दगडाखेरीज डोकें टेकायला ज्यांना दुसरी जागा नाहीं अशीं हजारों माणसें त्याच मुंबईंत अशा बंगल्यांच्या आंवतींभोंवतीं आपलीं शिणलेलीं शरीरें रस्त्याच्या कडेला पसरून देत असतात ! गोरगरिबांच्या तान्ह्या मुलांना दुधाचा थेंब मिळण्याची आपल्या देशांत आज मारामार झाली आहे. पण बड्या लोकांच्या घरची कुठलीहि मेजवानी पाहावी ! त्यांची कुत्रींमांजरें सुद्धां पक्वान्नांवर यथेच्छ ताव मारीत असलेलीं दिसतील. या भयंकर विषमतेमुळें दुसऱ्याच्या होळीवर पोळी भाजून घेण्याची संवय मनुष्याच्या अंगवळणीं कशी पडते आणि त्याची माणुसकी हळूहळू कशी नाहींशी होते हें या निबंधांत काणेकरांनीं दिग्दर्शित केलें आहे.

● ● ●

स्मशानांतसुद्धां केव्हां केव्हां गमतीच्या गोष्टी ऐकावयाला मिळतात, असें जर मीं म्हटलें तर माझ्यावर कोणीहि राक्षसी वृत्तीचा आरोप करील; पण खरोखरच माझ्या एका मित्रानें ऐकलेली पुढील गोष्ट किती गमतीची आहे ! ती ऐकल्यावरोवर तो आरोप मागेंच घ्यावा लागेल. एकदां सहज स्मशानाच्या बाजूला तो फिरावयास गेला होता, आणि दरवाज्यापाशीं असलेल्या जळाऊ लाकडाच्या दुकानाशीं तो सहज उभा राहिला असतांना आंत चाललेला पुढील संवाद त्याच्या कानांवर पडला. दुकानदार अगदीं मन:पूर्वक आपल्या पाहुण्यांशीं बोलत होता.

" काय करावं हो ! धंद्याला असे हलाखीचे दिवस अगदीं कधींच आले नव्हते बुवा. नाहीं तर गेल्या इन्फ्ल्युएन्झाच्या सांथीचे दिवस; महाराज, रोजचा गल्ला सांगितला तर तुमचा विश्वास बसणार नाहीं ! "

मुंबईची त्या वेळची हवा अत्यंत छानदार होती. रोगराई कांहीं नव्हती आणि

एकंदर शहराचें आरोग्य उत्तम असल्यामुळें लोकांना आनंद वाटण्यासारखी ती गोष्ट होती; पण त्या वेळींहि त्या स्थळीं असा एक मनुष्य होता कीं, जो दुःखांत चूर झाला होता आणि इन्फ्ल्युएन्झाच्या साथींत सारी जनता हवालदिल झाली असतांना तो आनंदाच्या सागरांत पोहत होता.

कोणी म्हणेल कीं, शेजारच्या घराला आग लागली असतांना त्यावर स्वतःची पोळी भाजून घेण्याचा हा प्रकार! पण माझ्या मतें वरीलप्रमाणें त्या दुकानदारावर दुष्ट हेतूचा आरोप करणें न्याय्य होणार नाहीं. त्याची अशी इच्छा नव्हती, कीं खूपसे लोक मरावे व त्यावर आपली चलती व्हावी! पण पोटाचा धंदाच लांकडें विकण्याचा असल्यामुळें तो धंदा खालावल्याबरोबर दुःख होणें व धंद्याला उर्जितावस्था आली असतां आनंद होणें साहजिक होतें. अर्थात् असें होण्याचीं कारणें काय होतीं, याची त्याला स्पष्ट जाणीव खास नव्हती. पण प्रस्तुत समाजाची रचनाच मुळीं एक प्रकारच्या विषमतेच्या पायावर झालेली असल्यामुळें वरील प्रकार होणें अगदीं अपरिहार्य आहे. आणि त्यावरून एखाद्या व्यक्तीला दुष्ट अगर सुष्ट म्हणणें केव्हांहि योग्य होणार नाहीं.

सध्यांच्या समाजव्यवस्थेंत एका वर्गाचे हितसंबंध दुसऱ्या वर्गाशीं असे कांहीं निगडित झाले आहेत, कीं एकाला जें अमृत तें दुसऱ्याला विष! वस्तु खूप महाग विकणें हें विकणाराचें ध्येय, तर त्या वस्तूला शक्य तितकी कमी किंमत देणें ही विकत घेणाराची महत्त्वाकांक्षा! बर्नार्ड शॉ आपल्या एका नाटकाच्या प्रस्तावनेंत म्हणतात, कीं एखाद्या शहराला जितक्या डॉक्टरांची जरूरी आहे तितकेच डॉक्टर तेथें राहूं द्यावेत, आणि ते सुद्धां सरकारी पगारावर! नाहीं तर समाजाला तें धोक्याचें आहे. लोकांच्या शरीराची चिरफाड करणें हें जर उपजीविकेचें साधन असेल तर पोटाला चिमटा बसावयाचा प्रसंग आला असतांना कांहीं तरी थाप मारून एखाद्याचा न कापतां बरा करण्यासारखा अवयव कापून टाकण्याचा मोह एखाद्या शस्त्रकलाविशारदाला कां होणार नाहीं? म्हणूनच समाजाचा अत्यंत जिव्हाळ्याचा असा हा धंदा खाजगी उत्पन्नाची बाब करून गबर होण्यासाठीं वाटेल तितक्या व्यक्तींना मोकळा ठेवणें धोक्याचें आहे. नाहीं तर वर उल्लेखिलेल्या लांकूडविक्यासारखा प्रकार व्हावयाचा! पण समाजाचे सर्वच व्यवहार जोंपर्यंत चढाओढीच्या तत्त्वावर अधिष्ठित झालेले आहेत, आणि खाजगी मालमत्ता हेंच सर्व व्यवहाराचें ध्येय आहे, तोंपर्यंत डॉक्टरीच्या धंद्याला हें तत्त्व लागू करणें केवळ मूर्खपणाचें

होईल. सर्व उत्पादनांच्या आणि समाजहिताच्या साधनांवर जोंपर्यंत सर्व समाजाची सत्ता नाहीं, आणि चढाओढीचें जीवन हेंच समाजाला शांतिप्रद आणि हितावह आहे असें जोंपर्यंत स्वतःला मानवतेचे मित्र म्हणविणारे, पण खरोखर बुद्धिमान् बदमाश असलेले समाजाचे नेते म्हणवत आहेत, तोंपर्यंत असले हे प्रकार चालावयाचेच; मग ते कितीहि विचित्र दिसोत, किंवा कोणाला ते कितीहि कडू वाटोत !

आद्य नाटयछटाकारांच्या 'पंत मेले' आणि 'राव चढले' या नाटयछटा मला आठवतात; एकासमोर एक अशा त्या छापल्या आहेत. पहिल्या छटेंत पंत मेल्यानंतरचें त्यांच्या घरचें हृदयद्रावक नाटयचित्र रेखाटलें राहे. बाप मेल्यामुळें पोरका झालेला मुलगा माधुकरी मागावयाला जातांना आपल्या रडणाऱ्या वहिणीला 'रडूं नकोस, मी वरणभात आणून तुला घालीन, आईला तूं बाबां-संबंधीं विचारून रडवूं नकोस,' अशा तऱ्हेनें समजावीत आहे.

दुसऱ्या छटेंत पंत मेल्यामुळें रिकामी झालेली जागा रावांना मिळून पांच रुपये प्रमोशन मिळाल्यामुळें त्यांच्या घरीं झालेला आनंदीआनंद वर्णिला आहे. हपिसांतून येतांना पेढे घेऊन राव घरीं आले आहेत. आपल्या सोनीला, बापूला देवाच्या पायां पडा, म्हणून सांगून हवे तितके पेढे उदारपणें देत आहेत; मित्राला सांगताहेत कीं, 'इतके दिवस रात्रंदिवस वाट पाहिल्याचें परमेश्वरानें शेवटीं सार्थक केलें ! सहा वर्षांनीं पंधरांचे वीस रुपये झाले आणि ते सुद्धां पंत मेले आणि त्यांची जागा मिळाली म्हणून !'

आतां बिचाऱ्या रावांना आणि त्या गरीब बापड्या लांकूडविक्याला दोष द्यावयाचा, कीं असल्या प्रसंगांना वाव देणारी दुष्ट समाजरचना बदलावयाची !

● ● ●

## अभ्यास

१. बोरकरांची 'साद' (काव्यज्योति) ही कविता पाठ करा. विषम समाजरचना बदलली पाहिजे असें काणेकर म्हणतात. बोरकर आपल्या प्रार्थनेंत देवापाशीं कुठल्या कुठल्या गोष्टी मागतात ?

२. खांडेकरांची 'नवा प्रातःकाल' ही गोष्ट वाचून तिची चर्चा करा.

३. नाटयछटाकार 'दिवाकर' यांची 'कारकून' ही नाटिका वाचून तिच्या आधारें एक गोष्ट लिहा.

● ● ●

# दुसऱ्याच्या डोळयांनीं पाहण्याची संवय



## परिचय

जगांत गैरसमज, दुःखें आणि भांडणें यांना तोटा नाहीं, हें आपण नित्य पाहतों. या सर्वांच्या मुळाशीं केवळ मनुष्याचा दुष्ट स्वभावच असतो काय? छे! अनेकदां केवळ अज्ञानामुळें आपण दुसऱ्याच्या हेतूंविषयीं, उद्‌गारांविषयीं किंवा त्याच्या हातून घडणाऱ्या वर्तनाविषयीं आपलें मन कलुषित करून घेतों. शाळेंत उशीरा येणारा प्रत्येक मुलगा कांहीं उडाणटप्पू असत नाहीं. एखादे वेळीं तो वार लावून जेवणारा गरीब विद्यार्थी असतो. ज्याच्या घरीं त्याचा वार असतो तिथलीं नाहीं नाहीं तीं कामें त्याला करावीं लागतात आणि म्हणून त्याला शाळेला यायला उशीर होतो. पण केवळ नियमांवर बोट ठेवून वागणाऱ्या एखाद्या शिक्षकाला ही साधी गोष्ट सुद्धां कधीं कधीं दिसूं शकत नाहीं असा अनुभव आहे.

व्यवहारांतहि असेच प्रकार नित्य घडत असतात. अ बची बाजू जाणून घेत नाहीं, बला अची बाजू पाहण्याची इच्छा होत नाहीं आणि त्यामुळे दोघांमधल्या कुरबुरीची जी ठिणगी जागच्या जागीं सहज विझली असती तिचें न कळत मोठ्या आगींत रूपांतर होतें.

'लोकांनीं तुमच्याशीं जसें वागावेंसे तुम्हांला वाटतें, तसेंच तुम्हीं लोकांशीं वागलें पाहिजे.' Do unto others as you wish to be done by! ह्या ख्रिस्ताच्या उपदेशाचें मर्म तरी दुसरें काय आहे? दुसऱ्याच्या डोळयांनीं पाहण्याची संवय मनुष्याला ज्या दिवशीं लागेल, त्या दिवशीं या जगांतील निम्मीं दुःखें नाहींशीं होतील!

● ● ●

एक फार सुंदर ढाल होती. तिची एक बाजू संपूर्ण सोन्याची व दुसरी सबंध बाजू चांदीची होती. त्या ढालीच्या उभय बाजूंना उभे राहून दोन गृहस्थ तावातावानें भांडत होते. चांदीच्या बाजूचा गृहस्थ ती ढाल चांदीची

आहे असें घसा फोडून सांगत होता व सोन्याच्या वाजूचा गृहस्थ "तूं महामूर्ख आहेस, ही ढाल सोन्याची आहे ! " म्हणून त्या दुसऱ्या गृहस्थाला बजावीत होता. भांडण अगदीं विकोपाला जाऊन आतां हमरीतुमरीवर येणार, इतक्यांत तेथून एक तिऱ्हाईत गृहस्थ चालला होता. त्याचें या भांडणाकडे लक्ष जाऊन त्यानें ढालीच्या दोन्ही बाजू पाहिल्या व त्या भांडणाऱ्या गृहस्थांना तो म्हणाला, " जरा ऐकाल का ? तम्ही एकमेकांच्या जागा बदला, आणि मग पाहा तुमचं भांडण मिटतं कीं नाहीं तें! " दोघांनींहि जागा बदलल्या आणि पाहतात तों काय ! ' चांदीची आहे, चांदीची आहे' म्हणून घसा फोडणारा उद्गारला, " अरें, खरेंच सोन्याची आहे कीं ! " तीच स्थिति सोन्याची आहे म्हणणाराची झाली. आणि आपल्या भांडणांत कांहींच तथ्य नव्हतें, अशी दोघांचीहि खात्री पटली.

या गोष्टीची आठवण व्हावयाचें कारण एवढेंच कीं, नुक्ताच अगदीं अशाच तऱ्हेचा एक कडाक्याचा वादविवाद माझा आणि माझ्या एका मित्राचा झाला. एका प्रसिद्ध लेखकाचा लघुकथासंग्रह आम्हीं वाचावयाला घेतला होता, आणि आम्ही दोघेहि त्यांविषयीं वोलत होतों.

" भिकार आहे पुस्तक अगदीं ! " माझा मित्र उद्गारला.

" काय ? —भिकार आहे? . . . इतक्या सुंदर लघुकथा मराठींत अजून कुणींच लिहिलेल्या नाहींत, असं मला वाटतं !" मी म्हणालों.

" खूपच रसिक आहांत तर मग तुम्ही !" तो हेटाळणीच्या स्वरांत म्हणाला. झाली भांडणाला सुरवात ! वराच वेळ शब्दाशब्दी झाल्यावर मी म्हणालों, " कुठच्या रे गोष्टीला तूं भिकार म्हणतोस ? "

तो म्हणाला, "अमुक. . . "

ती गोष्ट मीं वाचलेली नव्हती. त्याचप्रमाणें ज्या गोष्टीचें नांव मीं सांगितलें, ती त्यानें वाचलेली नव्हती. शेवटीं त्यानें सांगितलेली गोष्ट मीं वाचून पाहिली, आणि ती खरोखरच टाकाऊ होती. लेखकाचा तो अगदीं नवशिका प्रयत्न होता. आणि मीं सुचविलेली गोष्ट वाचून पाहिल्या-वर ती उत्कृष्ट असल्याचें माझ्या मित्राचेंहि मत पडलें.

आपलीं किती तरी भांडणें अशाच प्रकारचीं असतात. दुसऱ्याची भूमिकाच समजून न घेतां आपण बोलतों आणि केव्हां केव्हां याचा परिणाम परस्परांच्या अंतःकरणांत निष्कारण कडूपणा उत्पन्न करण्यांत होतो. मला वाटतें दुसऱ्याच्या डोळयांनीं पाहण्याची थोडीशी तरी संवय आपण प्रत्येकानें लावून घेतली पाहिजे.

मात्र केव्हां केव्हां विरुद्ध भूमिकांवरून एकाच गोष्टीचा विचार करतांना भांडणें न होतां आश्चर्यकारक मतैक्यसुद्धां होतें. एकदा एका आजीबाईंचें आणि माझें कमालीचें एकमत झालें !

" हल्लींच्या बायका अगदींच निःसत्त्व! " आजीबाई संतापानें म्हणाल्या.

" नाहीं तर काय ? ··· " मी म्हणालों.

आजीबाई अगदीं खूष झाल्या माझ्यावर; पण जर का कुणी आमचें असें मत कां आहे म्हणून कारणें विचारलीं असतीं, तर मात्र मोठाच घोंटाळा झाला असता ! आजीबाई आधुनिक बायकांना वाईट म्हणत होत्या, कारण आजीबाईंना हव्या होत्या तितक्या त्या मागासलेल्या नव्हत्यां म्हणून ! आणि मीं त्यांना वाईट म्हणावयाचें कारण माझ्या कल्पनेइतक्या त्या पुढारलेल्या नव्हत्या म्हणून ! तरी पण केव्हां केव्हां उत्तर ध्रुवाशीं दक्षिण ध्रुवाची अचानकपणें गांठ पडते ती अशी !

वरील सर्व विवेचनावरून जर कुणी असा तर्क करील, कीं मी सुवर्णमध्यवादी संशयात्मा आहे म्हणून, तर मात्र मला त्याचा लगेच इन्कार करावा लागेल. माझें म्हणणें एवढेंच, कीं नेहमीं दुसऱ्याची भूमिका समजावून घेण्याचा प्रयत्न करावा. त्याचा अर्थ असा नव्हे, कीं नेहमी दोन्ही बाजूंना थोडें थोडें सत्य असतेंच, व आपण वेळीं अवेळीं दोहोंच्या मधलीच बाजू मांडीत राहावें ! वाघाच्या आणि बकऱ्याच्या धडपडींत बकऱ्यानें ' प्राण वांचवा ' म्हणून आक्रोश केला असतां, आमचे सुवर्णमध्यवादी म्हणणार की " थांबा ! बकऱ्याची बाजू समजली, आतां वाघाची बाजू काय आहे ती आपण शांतपणें समजावून घेतली पाहिजे ! आणि मगच काय करावयाचें तें ठरविलें पाहिजे. "

एका सुवर्णमध्यवादी याचकाचा एक सुरेल युक्तिवाद मला आठवतो, तो सांगितल्याशिवाय माझ्यानें राहवत नाहीं.

